**शाखा अभियंता यांच्या विकल्पानुसार त्यांचे समावेशन ऊर्जा विभागातून सार्वजनिक बांधकाम विभागात करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. मुविनी-२०१६/प्र.क्र. १३० /ऊर्जा-५**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ३० नोव्हेंबर, २०१६.

<u>वाचा :</u>- १.उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. मुविनी-२०१६/प्र.क्र.५८/ऊर्जा-५ दि. ३० मार्च, २०१६.
२.उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शुध्दीपत्रक क्र. मुविनी-२०१६/प्र.क्र.५८/ऊर्जा-५ दि. ३० एप्रिल, २०१६.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त शासन निर्णयांन्वये ऊर्जा विभागाकडील विद्युत निरीक्षणालयाची आस्थापना सार्वजनिक बांधकाम विभागाकडून ऊर्जा विभागाच्या अधिपत्याखाली आणल्यानंतर विद्युत निरीक्षणालयांतर्गत कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांनी मुख्य विद्युत निरीक्षक यांचे मार्फत सार्वजनिक बांधकाम विभागात समावेशन करण्यासाठी दिलेले विकल्प, त्यांची सेवाजेष्ठता, मंजूर संवर्ग व संवर्गनिहाय रिक्त पदसंख्या या बाबी विचारात घेऊन, त्यांचे ऊर्जा विभागातून सार्वजनिक बांधकाम विभागात समावेशन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र. २ येथील शुध्दीपत्रकान्वये दि. ३० मार्च, २०१६ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट "ब" ऐवजी सुधारित परिशिष्ट "ब" निर्गमित करण्यात आले आहे.

२. संदर्भ क्र. २ येथील शुध्दीपत्रकान्वये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील विद्युत शाखेमधील शाखा अभियंता या संवर्गातील रिक्त पदाअभावी श्री. सचिन गो. बागुल, शाखा अभियंता व श्री. राहुल रो. चव्हाण, शाखा अभियंता यांना समावेशनामधून वगळण्यात आले होते. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या विद्युत शाखेतील १ पद स्वेच्छानिवृत्तीने व १ पद कर्मचाऱ्याच्या आकस्मिक निधनाने रिक्त झाले आहे. सदर पदांवर उपरोक्त शुध्दीपत्रकान्वये वगळण्यात आलेल्या श्री. बागुल व श्री. चव्हाण या शाखा अभियंत्यांना त्यांनी विहित मुदतीत दिलेल्या विकल्पानुसार सार्वजनिक बांधकाम विभागात सामावून घेणे शक्य होणार आहे. त्यानुसार त्यांचे ऊर्जा विभागातून सार्वजनिक बांधकाम विभागात समावेशन करण्यासाठी त्यांना सेवाजेष्ठतेनुसार कार्यमुक्त करण्याची विनंती, सार्वजनिक बांधकाम विभागाने केली आहे. त्यानुषंगाने संदर्भ क्र. २ येथील शुध्दीपत्रकासोबतच्या परिशिष्ट-ब मधील अ.क्र. ११ येथील श्री. म.म.मानकर, शाखा अभियंता यांना दि. ३०/११/२०१६ (म.नं.) रोजी सेवाजेष्ठतेनुसार कार्यमुक्त करण्यात येत आहे. तसेच सदर शुध्दीपत्रकासोबतच्या परिशिष्ट-ब मध्ये सेवाजेष्ठतेनुसार अ.क्र.१२ श्री. सचिन गो. बागुल, शाखा अभियंता व अ.क्र.१३ श्री. राहुल रो. चव्हाण, शाखा अभियंता यांना समाविष्ट करण्यात येत आहे. तसेच श्री. सचिन गो. बागुल, शाखा अभियंता यांना दि. ३०/११/२०१६ (म.नं.) रोजी व श्री. राहुल रो. चव्हाण, शाखा अभियंता यांना दि. ३१/१२/२०१६ (म.नं.) रोजी कार्यमुक्त करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१६११३०१७४८४६४६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhimashankar Yallapa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallapa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400051, st=Maharashtra, cn=Bhimashankar Yallapa Manta
Date: 2016.11.30 17:50:59 +05'30'

**( भि.य.मंता )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत -**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री(सा.बां.) यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री(ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
५. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधान सभा, विधानभवन, मुंबई
६. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (सा.बां.वि.), मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (ऊर्जा), मंत्रालय, मुंबई
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा )महाराष्ट्र-१, मुंबई ४०० ०२०
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२, नागपूर
११. अधिदान व लेखा अधिकारी, (अराप/रालेवि-१), मुंबई
१२. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१३. निवासी लेखाधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४. मुख्य अभियंता (विद्युत), सा.बां.वि. मर्झबान पथ, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई
१५. मुख्य विद्युत निरीक्षक,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, तिसरा मजला प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पू) मुंबई-७१
१६. अधिक्षक अभियंता, विद्युत निरीक्षण मंडळ, मुंबई/नागपूर/औरंगाबाद/पुणे
१७. सर्व कार्यासने ( ऊर्जा), मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती- ऊर्जा-५.